रत्नागिरी-सिंधुदूर्ग जिल्हा माथाडी व असंरक्षित कामगार मंडळातील कर्मचाऱ्यांच्या आकृतीबंधास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : युडब्ल्युए-२०१७/प्र.क्र.१४७/कामगार-५**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १४/०६/२०१७

वाचा : १) शासन निर्णय क्रमांक एसजीए-१५१२/प्र.क्र.३३२४/कामगार-५, ३ ऑक्टोबर, २०१२.
२) शासन निर्णय क्रमांक एसजीए-१५१२/प्र.क्र.३३२४/कामगार-५, ४ ऑक्टोबर, २०१२.

**प्रस्तावना :-**

शासन अधिसूचना, क्रमांक युडब्ल्युए-१३२००४/(३६/३)/ कामगार-५, दि. १२ जुलै, २००४ उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग अन्वये रत्नागिरी-सिंधुदूर्ग या जिल्ह्यांसाठी रत्नागिरी-सिंधुदूर्ग जिल्हा माथाडी व असंरक्षित कामगार मंडळाची स्थापना करण्यात आली आहे. या मंडळासाठी संदर्भाधीन शासन निर्णय दि. ३ ऑक्टोबर, २०१२ अन्वये एकूण तीन पदांची निर्मिती करण्यात आली आहे. तथापि, सदर माथाडी मंडळामध्ये पुरेसा कर्मचारी वर्ग नसणे व पर्यायाने माथाडी कायद्याची प्रभावीपणे अंमलबजावणी न होणे याबाबत कोकण श्रमजीवी माथाडी व जनरल कामगार युनियन यांनी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे याचिका क्र. ३६४६/२०१२ दाखल केली होती. सदर याचिकेमध्ये मा. उच्च न्यायालयाने दि. २२ मार्च, २०१७ रोजी दिलेल्या आदेशानुसार रत्नागिरी-सिंधुदूर्ग जिल्हा माथाडी व असंरक्षित कामगार मंडळातील कर्मचाऱ्यांचा आकृतीबंध तयार करुन त्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरुन सदर माथाडी मंडळाच्या आस्थापनेवर करावयाच्या पदनिर्मितीबाबत खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

सोबत जोडलेल्या परिशिष्ट-अ मध्ये नमुद केल्यानुसार रत्नागिरी-सिंधुदूर्ग जिल्हा माथाडी व असंरक्षित कामगार मंडळाच्या आस्थापनेवर एकूण ७ पदांची निर्मिती करण्यास खालील अटीनुसार शासन मान्यता देण्यात येत आहे.

१) रत्नागिरी-सिंधुदूर्ग जिल्हा माथाडी व असंरक्षित कामगार मंडळाने परिशिष्ट-अ मध्ये नमुद केलेल्या पदांच्या निर्मितीबाबत मंडळाने ठराव घ्यावा.

२) मंडळाच्या नवनियुक्त कर्मचाऱ्यांची नियुक्ती ही सेवाप्रवेश नियम मान्यतेच्या अधीन राहून प्रथम तीन वर्षाच्या निश्चित कालावधीसाठी सध्याच्या प्रचलित निवड समितीद्वारे चार महिन्यात करण्यात येईल.

३) मंडळाच्या कर्मचाऱ्यांना पाचव्या वेतन आयोगानुसार वेतन व भत्ते देय राहतील. प्रथम तीन वर्ष वेतन व भत्त्याव्यतिरिक्त कोणतेही इतर लाभ (जसे- भविष्य निर्वाह निधी, बोनस, ग्रॅच्युईटी इत्यादी) अनुज्ञेय राहणार नाहीत. तथापि त्यांना शासकीय कर्मचाऱ्यांना लागू असणाऱ्या अर्जित, नैमित्तीक, वैद्यकीय रजा, सणांच्या व शासकीय सुट्टया अनुज्ञेय राहतील.

४) मंडळात नियुक्त होणाऱ्या कर्मचाऱ्यांकरीता कामाची मानके मंडळ ठरवेल. उदा. निरीक्षकांनी दरमहा किमान ४० आस्थापनांना भेट देऊन माथाडी कायदा व योजनेची परिणामकारक अंमलबजावणी करण्याकरीता निरीक्षण शेरे पारीत करावयाचे आहेत. उर्वरित कर्मचाऱ्यांनी मंडळात नोंदित होणाऱ्या माथाडी कामगारांच्या संख्येनुसार वेतनपत्रक तयार करणे, वेतनाचे वाटप करणे, धनादेश बँकांमध्ये जमा करणे, त्यांचा ताळमेळ ठेवणे, लेखे लिहीणे, भविष्य निर्वाह निधीचे व्यवस्थापन व गुंतवणूक, तसेच बँक व्यवहार, थकीत वेतन व लेव्ही वसुलीचे परिगणन करणे, नोंद वह्या ठेवणे, मासिक, त्रैमासिक, वार्षिक अहवाल तयार करुन सादर करणे, लेखा परीक्षणाकरीता अभिलेख उपलब्ध करुन देणे या व अशा प्रकारच्या इतर कामांची मानके मंडळ निश्चित करेल व मंडळ कर्मचाऱ्यांना ती पूर्ण करावी लागतील.

५) सदर कर्मचाऱ्यांचे दरवर्षी मुल्यमापन केले जाईल व त्यांच्या ३ वर्षातील कामगिरीचा एकत्रित आढावा घेऊन त्यांची नियुक्ती पुढे चालू ठेवण्याविषयी विचार करण्यात येईल. सदर मुल्यमापनानंतर मंडळाकडे असणाऱ्या प्रशासकीय शिल्लक, त्यावरील व्याज, जमा लेव्ही व मालक/कामगार यांच्या वाढत्या नोंदणीचा आढावा घेऊन व एकूण मंडळाच्या आर्थिक परिस्थितीचा आढावा घेऊन मंडळातील कर्मचाऱ्यांच्या वेतनात सुधारणा करण्याचा प्रस्ताव मंडळ विचारात घेईल व त्यानुसार सादर केलेल्या प्रस्तावावर शासन स्तरावर अंतिम निर्णय घेण्यात येईल.

६) माथाडी मंडळाच्या लेव्हीमध्ये घट झाल्यास या पदाच्या वेतनावरील खर्च भागविण्यासाठी सदर मंडळास कोणत्याही प्रकारचे अनुदान/अर्थ सहाय्य शासनाकडून देण्यात येणार नाही.

७) मंडळासाठी भरावयाच्या रिक्त पदांसाठी राज्यशासनाच्या सामान्य प्रशासन विभागाने विहीत केलेल्या कार्यपध्दतीनुसार व प्रचलित नियमानुसार निवड प्रक्रिया पूर्ण करण्याची दक्षता संबंधित निवड समिती घेईल.

८) मंडळातील पदे भरताना मागासवर्गासाठी असलेल्या आरक्षणाच्या व अपंगांसाठी तसेच महिलांसाठी लागू असलेले आरक्षण याबाबत प्रचलित आदेशाची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी. विहीत पध्दतीने आरक्षणाची बिंदूनामावली तयार करुन ती विभागीय आयुक्त यांच्या कार्यालयातील मागासवर्ग कक्षाकडून तपासणी करुन घ्यावी व त्यानंतरच पदे भरण्याबाबत कार्यवाही करावी.

९) वरील अटी व शर्तीनुसार पद भरती करण्याबाबतची संपूर्ण जबाबदारी निवड समितीची व संबंधित मंडळाच्या अध्यक्षांची असेल व सदर प्रक्रियेस कामगार आयुक्त संनियंत्रण करतील.

सदरहू शासन निर्णय हा मा. उच्च न्यायालय, मुंबई याचिका क्रमांक ३६४६/२०१२ मध्ये मा. उच्च न्यायालयाने दि. २२ मार्च, २०१७ रोजीच्या आदेशानुसार व महाराष्ट्र माथाडी हमाल व इतर श्रमजीवी कामगार (नोकरीचे नियमन व कल्याण) अधिनियम, १९६९ च्या कलम ७(४) अन्वये प्राप्त झालेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६१४१६२६०५४३१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यापाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by Sanjay Vithoba Kalbhor
Date: 2017.06.14 17:56:29 +05'30'

**( संजय काळभोर )**
**कार्यासन अधिकारी**

**सोबत** : परिशिष्ट-अ

**प्रत :-**

१) मा. मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव.
२) मा. राज्यमंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव.
३) प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहायक.
४) कामगार आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५) सह कामगार आयुक्त, कामगार भवन, सी-२०, ई-ब्लॉक, वांद्रे-कुर्ला संकुल, वांद्रे (पूर्व), मुंबई.
६) अध्यक्ष, रत्नागिरी-सिंधुदूर्ग जिल्हा माथाडी व असंरक्षित कामगार मंडळ.
७) अध्यक्ष, सर्व माथाडी मंडळे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८) निवडनस्ती (कामगार-५).

**शासन निर्णय क्रमांक : युडब्ल्युए-२०१७/प्र.क्र. १४७/कामगार-५, दिनांक १४/०६/२०१७ सोबतचे सहपत्र**

**परिशिष्ट-अ**

**रत्नागिरी-सिंधुदूर्ग जिल्हा माथाडी व असंरक्षित कामगार मंडळातील कर्मचाऱ्यांचा आकृतीबंध**

| अ. क्र. | पदाचे नाव | मंजूर पदे | नव्याने निर्माण करावयाची पदे (टप्प्याटप्प्याने) | एकूण पदे |
|---|---|---|---|---|
| १. | निरीक्षक | ०१ | ०१ | ०२ |
| २. | लिपिक-टंकलेखक | ०१ | ०१ | ०२ |
| ३. | सहायक लेखापाल | ०१ | ०० | ०१ |
| ४. | शिपाई | ०० | ०१ | ०१ |
| ५. | वाहन चालक | ०० | ०१ | ०१ |
| | **एकूण :** | ०३ | ०४ | ०७ |